**दिनांक ३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर, २०२० रोजी नागपूर विभागातील जिल्हयांमध्ये निर्माण झालेल्या पुरपरिस्थितीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत देण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.२४१ /म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २९ सप्टेंबर, २०२०

<u>संदर्भ :</u>
१) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म -३, दिनांक १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७ /म -३, दिनांक २५.०१.२०१८
३) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१७/प्र.क्र.२४१ /म -३, दिनांक ०४.०९.२०२०
४) शासन निर्णय,क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.२३८/म -३, दिनांक १५.०९.२०२०
५) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्रमांक: महसूल/कार्या ७(५)/कावि-६८०/२०२०, दिनांक २४.०९.२०२०

<u>प्रस्तावना</u>:

दिनांक ३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर,२०२० रोजी नागपूर विभागातील जिल्हयांमध्ये पुरपरिस्थिति निर्माण झाली होती. या पुरपरिस्थितीमुळे सामान्य जनजीवन मोठया प्रमाणात विस्कळीत होवून मालमत्तेचेही मोठया प्रमाणात नुकसान झाले आहे. या नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित झालेल्या नागरिकांना विविध बाबींसाठी वाढीव दराने मदत देण्यासाठी मंत्रिमंडळाच्या मान्यतेने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. बाधित नागरिकांना राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दराने मदत देय आहे.

२. संदर्भाधीन क्रमांक १, २ व ४ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या दरानुसार, तसेच विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार बाधित नागरिकांना मदत देण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांनी संदर्भाधीन क्रमांक ५ येथील पत्रान्वये रू १६३५७.१७ लाख इतक्या निधी मागणीचा प्रस्ताव शासनास पाठविला आहे.

३. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार बाधितांना मदतीचे वाटप करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधुन एकूण रु **१६२८१.०७ लाख** इतका निधी मंजूर करण्याचा निर्णय राज्य कार्यकारी समितीच्या दिनांक २५.०९. २०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये घेण्यात आला आहे. सदर निर्णयास अनुसरून निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय</u>:

दिनांक ३०-३१ ऑगस्ट, २०२० व १ सप्टेंबर,२०२० रोजी नागपूर विभागातील जिल्हयांमध्ये निर्माण झालेल्या पुरपरिस्थितीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदतीचे वाटप करण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांनी मागणी केल्याप्रमाणे राज्य आपत्ती प्रतिसाद निधी व राज्य शासनाच्या निधीमधून या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रू १६२८१.०७ लाख (अक्षरी रू एकशे बासष्ट कोटी एकाऐंशी लाख सात हजार फक्त) इतका निधी संबंधित लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात येत आहे. सदर निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त, नागपूर यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

२. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दि. ४.९.२०२० च्या शासन निर्णयान्वये २२४५ ०१५५ या लेखाशीर्षाखाली खालीलप्रमाणे जिल्हानिहाय आगाऊ स्वरूपात निधी वितरीत करण्यात आला आहे. या शासन निर्णयान्वये मृत्यु/जखमी तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे तसेच घरगुती भांडी / वस्तुंकरिता अर्थ सहाय्य या प्रयोजनार्थ २२४५ ०१५५ या लेखाशीर्षाखाली खालीलप्रमाणे अंतिम निधी मंजूर करण्यात येत आहे.

**(रक्कम रु लाखात)**

| अ.क्र. | जिल्हा | यापूर्वी वितरीत केलेला निधी | जिल्हयांची अंतिम मागणी | या शासन निर्णयान्वये सदर लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात येत असलेला अंतिम निधी | जिल्हयांकडे शिल्लक राहणारा / अतिरिक्त आवश्यक निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | नागपूर | २५०.०० | १८८.८० | १८८.८० | (-६१.२०) |
| २ | भंडारा | २८०.०० | ५८१.०८ | ५८१.०८ | (+३०१.०८) |
| ३ | गोंदिया | ७५.०० | ६०.१० | ६०.१० | (-१४.९०) |
| ४ | वर्धा | २.२५ | २.२५ | २.२५ | ० |
| ५ | चंद्रपूर | २५०.०० | २८२.७५ | २८२.७५ | (+३२.७५) |
| ६ | गडचिरोली | २९.०० | ३२.३० | ३२.३० | (+३.३०) |
| **एकूण** | | **८८६.२५** | **११४७.२८** | **११४७.२८** | **(+ २६१.०३)** |

३. नागपूर विभागातील जिल्हयासाठी बाधितांना मदतीचे तातडीने वाटप करता यावे यासाठी मृत्यु/जखमी तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे तसेच घरगुती भांडी / वस्तुंकरिता अर्थ सहाय्य या प्रयोजनार्थ २२४५ ०१५५ या लेखाशीर्षाखाली एकूण रू. ८८६.२५ लक्ष ( रूपये आठ कोटी शहाऐंशी लाख पंचवीस हजार फक्त ) इतका निधी आगाऊ स्वरूपात दि.४.९.२०२० च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. परंतु जिल्हयांकडून प्राप्त झालेल्या अंतिम मागणी व त्यावर प्राप्त मान्यतेनुसार वर नमूद केल्याप्रमाणे नागपूर व गोंदिया या जिल्हयांना अनुक्रमे रू १८८.८० लक्ष व रू ६०.१० लक्ष असा एकूण रू २४८.९० लक्ष इतका निधी अंतिम देय ठरतो. त्यामुळे नागपूर व गोंदिया या दोन जिल्हयांकडे या लेखाशीर्षाखाली अतिरिक्त झालेला एकूण रू ७६.१० लक्ष इतका निधी बीम्स प्रणालीवर परत घेवून त्याचे भंडारा जिल्हयास फेरवाटप करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्या प्रमाणे कार्यवाही करावी. या परिणामी भंडारा जिल्हयास वरील प्रयोजनासाठी एकूण रू. ५८१.०८ लक्ष इतका अंतिम निधी मंजूर राहील. परंतु या शासन निर्णयानुसार २२४५ ०१५५ या लेखाशीर्षाखाली भंडारा जिल्हयास निव्वळ रू २२४.९८ लक्ष इतका निधी कार्यासन म-११ यांनी वितरीत करावा.

४. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सुचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक १५.९.२०२० च्या शासन निर्णयान्वये मदतीचे वाढीव दर मंजूर करण्यात आले आहेत. त्या वाढीव दरापैकी **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या (SDRF) संदर्भाधीन क्रमांक**

**१ व २ येथील शासन निर्णयातील दराने** मदत प्रदान करण्यासाठी २२४५ २४५२, २२४५ ०१५५, २२४५ ०३१५, २२४५ ०२७१,२२४५ ०३२४,२२४५ ०३३३ व २२४५ ०२९१ या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधी खर्च करण्यात यावा आणि **वाढीव मंजूर दर वजा SDRF दर यातील फरकाच्या मदतीची रक्कम** तसेच ज्या बाबींसाठी केवळ राज्य शासनाच्या निधीमधून खर्च करावयाचे आहे त्यावरील खर्च लेखाशीर्ष २२४५ २१९४, २२४५ २३०९, २२४५ २३२७ , २२४५ २३८१ व २२४५ २२४७ या लेखाशीर्षाखाली वितरित करण्यात आलेला निधीतून भागविण्यात यावा. ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन क्रमांक १ ते ४ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

५ . शेती व बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक पिकाच्या नुकसानीकरीता मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्या शेतकऱ्यांना अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदतीची किमान रक्कम रू १०००/- तसेच बहुवार्षिक पिकांसाठी मदतीची किमान रक्कम रू २०००/- अनुज्ञेय राहील.

iv) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

v) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये

vi) शेत पिकांच्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये.

६. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. या शासन निर्णयान्वये संपूर्ण रक्कम बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत असली तरी, लाभार्थी निश्चित झाल्यानंतर वित्तिय शिस्तीच्या दृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रत्यक्ष गरजेनुसारच कोषागारातून रक्कम आहरित करून त्यानंतरच रक्कम लाभार्थ्यांच्या थेट बँक खात्यामध्ये ऑनलाईन पध्दतीने हस्तातंरित करण्याबाबत दक्षता घ्यावी. सदर निधी अनावश्यकरित्या कोषागारातून आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**. या सर्व सुचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

७. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

८. वरील प्रयोजनासाठी प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळे इत्यादी अंतर्गत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या सर्व उप/गौण शिर्षाखाली, ३१ सहाय्यक अनुदाने या उदिष्टांतर्गत निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : २१२/२०२०/व्यय-९, दिनांक २९.०९.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९२९१६३९००८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.09.29 16:41:18 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय,मुंबई,
४. विभागीय आयुक्त,नागपूर,
५. जिल्हाधिकारी, नागपूर/वर्धा/भंडारा/गोंदिया/चंद्रपूर/गडचिरोली,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
८. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/वर्धा/भंडारा/गोंदिया/चंद्रपूर/गडचिरोली ,
१०. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
११. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१५. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).

## शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२० /प्र.क्र.२४१/म-३, दिनांक: २९ सप्टेंबर, २०२० चे विवरणपत्र

(रक्कम रू. लाखात)

| मदतीची बाब | लेखाशीर्ष | नागपूर | वर्धा | भंडारा | गोंदिया | चंद्रपूर | गडचिरोली | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मत्य बोटी व जाळयांसाठी / मत्सबीज शेतीसाठी अर्थसहाय्य | २२४५ ०३२४ ( SDRF) | १४.३५ | ०.०० | २२.०३ | २०.०० | ३.२९ | १७.८९ | **७७.५६** |
| मृत्यु/जखमी तसेच नैसर्गिक आपत्तीमध्ये घरे पुर्णत: क्षतीग्रस्त झाली असल्यास कपडे तसेच घरगुती भांडी / वस्तुंकरिता अर्थ सहाय्य | २२४५ ०१५५ (SDRF) | ०० | ०.०० | २२४.९८ | ०० | ३२.७५ | ७.३० | **२६५.०३** |
| | २२४५ २१९४ (राज्य निधी ) | १८४.८० | ०.०० | ५६४.९५ | ६०.१० | २८२.७५ | ३२.३० | **११२४.९०** |
| शेतीपिकांचे नुकसान | २२४५ २४५२ (SDRF) | १९९८.७६ | ३४.५० | १३६०.०२ | ४७०.२२ | १६६४.२० | १३७०.१६ | **६८९७.८६** |
| | २२४५ २३०९ (राज्य निधी ) | १४७४.८७ | ३४.५० | ११३४.३२ | ४२४.४७ | १२४४.३० | १००२.९१ | **५३१५.३७** |
| मृत जनावरांसाठी मदत | २२४५ ०३१५ (SDRF) | २०.८७ | ०.०० | ३८.०८ | ३.९९ | २०.३१ | ०.५५ | **८३.८०** |
| पुर्णत: नष्ट/मोठया प्रमाणावर / अंशत: पडझड झालेली कच्ची/पक्की घरे, नष्ट झालेल्या झोपडया, गोठयांचे नुकसान | २२४५ ०२७१ (SDRF) | ६७७.३५ | ०.०० | ७६४.३० | २२६.६४ | ३८५.९४ | १.७९ | **२०५६.०२** |
| | २२४५ २३२७ (राज्य निधी ) | १.०५ | ०.०० | ३.२६ | ६.६२ | १.०४ | ०.०७ | **१२.०४** |
| हस्तकला/कारागिर/बारा बलुतेदार यांना मदत | २२४५ ०३३३ (SDRF) | ०.०० | ०.०० | १.४८ | ०.०० | १.१५ | ०.०० | **२.६३** |
| दुकानदार व टपरीधारकांना मदत | २२४५ २३८१ (राज्य निधी ) | २.२० | ०.०० | २०.६० | ९.४० | २५.१० | ०.१० | **५७.४०** |
| जमिनीतील वाळू,चिकण,माती, क्षार काढून टाकण्यासाठी शेतकऱ्यांना सहाय्य, नदींच्या रुपांतरामुळे झालेले जमीनीचे नुकसानीसाठी शेतकऱ्यांना सहाय्य | २२४५ ०२९१ (SDRF) | ११७.६६ | ०.०० | २०.४६ | २.७९ | ८७.७२ | २.२९ | **२३०.९२** |
| मोफत अन्नधान्य व केरोसिन वाटपासाठी मदत | २२४५ २२४७ (राज्य निधी ) | २५.८८ | ०.०० | ८९.०५ | ८.१७ | ३२.५१ | १.९३ | **१५७.५४** |
| **एकूण** | | **४५१७.७९** | **६९.००** | **४२४३.५३** | **१२३२.४०** | **३७८१.०६** | **२४३७.२९** | **१६२८१.०७** |